**मुख्य द्वार उभारणी विभागीय पथक क्र.३, पुणे या विभागीय पथक कार्यालयाचे पुणे येथील <u>मुख्यालय स्थलांतरीत करणे</u>.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा-२०१८/प्र.क्र.५६/२०१८/आ.(प्रशि),**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २० ऑगस्ट, २०१८.

<u>वाचा</u> : १. शासन निर्णय क्र.आढावा-२०१७/प्र.क्र.२५७/२०१७/आ.(प्रशि.), दि.१०.०१.२०१८.
२. शासन आदेश क्र.आढावा-२०१७/प्र.क्र.२५७/२०१७/आ.(प्रशि), दि.२०.०२.२०१८.

**<u>प्रस्तावना-</u>**

संदर्भिय क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मुख्य द्वार उभारणी पथक क्र.३, पुणे या विभागीय कार्यालया अंतर्गतच्या पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर या जिल्ह्याच्या ठिकाणी कार्यरत उपविभागीय कार्यालयांचे विभागीय कार्यालयांतर्गत विलिनीकरण करण्यात येऊन, मुख्य द्वार उभारणी विभागीय पथक क्र.३, पुणे या नावाने पुणे मुख्यालयी कार्यान्वित करण्यात आले आहे. या कार्यालयाच्या नियंत्रणाखाली पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर, रत्नागिरी, सिंधुदुर्ग या जिल्ह्यांतील तसेच लगतच्या गोवा राज्यातील मोठे व मध्यम धरणावरील द्वार परिचलन, देखभाल-दुरुस्ती इ. आवश्यक कामे हाताळली जात आहेत. या विभागीय पथकाचे कार्यक्षेत्र विचारात घेता, जिल्ह्यातील प्रकल्प व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने मुख्यालय मध्यवर्ती ठिकाणी असणे आवश्यक आहे. यास्तव सदर पथक कार्यालयाचे मुख्यालय मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक यांच्या शिफारशीनुसार मध्यवर्ती ठिकाणी स्थलांतरीत करुन या पथकाची फेररचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक यांच्या नियंत्रणाखालील अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, कोल्हापूर अंतर्गतचे मुख्य द्वार उभारणी विभागीय पथक क्र.३, पुणे या विभागीय पथक कार्यालयाचे मुख्यालय पुणे येथून पेठ वसाहत, वाघवाडी, ता.वाळवा, जि.सांगली येथे प्रशासकीय कामकाजाच्या दृष्टीने विभागाच्या शासकीय जागेत स्थलांतरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. शासन निर्णयान्वये मुख्य द्वार उभारणी विभागीय पथक क्र.३ या विभागीय पथक कार्यालयांतर्गत ४ उपविभागीय कार्यालयांचे विलिनीकरण करण्यात आले आहे. तथापि, विभागीय पथक कार्यालयाचे पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर, रत्नागिरी, सिंधुदुर्ग असे विस्तृत कार्यक्षेत्र विचारात घेता, सातारा व कोल्हापूर येथील उपविभागीय कार्यालयांच्या मुख्यालयी उपपथके कार्यरत ठेवण्यात यावीत.

३. सातारा व कोल्हापूर येथील उपपथकांसाठी आवश्यक अधिकारी/ कर्मचारी यांची सेवा दि.१०/०१/२०१८ च्या शासन निर्णयान्वये संबंधित विभागीय पथक कार्यालयास मंजूर केलेल्या पदसंख्येतून उपलब्ध करुन घेण्यात यावी.

४. विभागीय पथक कार्यालयाच्या मुख्यालय स्थलांतरण तसेच सातारा व कोल्हापूर मुख्यालयी उपपथक कक्ष कार्यान्वित करण्याच्या प्रक्रियेमुळे दि.१०.०१.२०१८ च्या शासन निर्णयामधील नमूद अटींमध्ये कोणताही बदल करण्यात येत नाही.

तसेच, संदर्भिय शासन आदेश क्र.२ अन्वये वाहनचालक या संवर्गातील कार्यरत कर्मचाऱ्यांची सेवा संबंधित विभागीय पथक कार्यालयांतर्गत पुढील आदेश होईपर्यंत चालू ठेवण्यास व त्यांचे वेतन व तद्नुषंगिक भत्ते त्यांच्या नियंत्रक कार्यालयांच्या लेखाशिर्षातून अदा करण्यास मान्यता दिल्या प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

५. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि. ०८मार्च, १९८४ मधील तरतूदीनुसार, मुख्य द्वार उभारणी विभागीय पथक क्र.३, पेठ वसाहत, वाघवाडी, ता.वाळवा, जि.सांगली या विभागीय पथकाचे कार्यकारी अभियंता यांना आहरण व संवितरण अधिकारी व संबंधित मंडळ कार्यालयाच्या अधीक्षक अभियंता यांना विभागीय पथक कार्यालयाचे "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच या कामी होणारा खर्च सध्याच्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर विभागीय पथक कार्यालय स्थलांतरीत केलेल्या मुख्यालयाच्या ठिकाणी शासकीय जागेत कार्यान्वित होतील, यादृष्टीने संबंधित मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता कार्यालयांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही तात्काळ करावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०८२०१५४५११८०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sunil Gangaram Gangarkar

Digitally signed by Sunil Gangaram Gangarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b2512fdfec4104829bc2f439e33adb2e3f823a285cfade8149e690564bc13f6, cn=Sunil Gangaram Gangarkar
Date: 2018.08.20 15:47:44 +05'30'

**( सु.गं.गांगरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद / विधान सभा.

७) मा. विधानपरिषद / विधानसभा सदस्य (सर्व).
८) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१२) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१३) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक.
१५) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१७) मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक.
१८) अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, कोल्हापूर.
१९) आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. (विभाग व उपविभागीय कार्यालयांमध्ये झालेल्या बदलाची आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२१) कार्यकारी अभियंता, मुख्य द्वार उभारणी पथक क्र.३, पुणे.
२२) द्वार उभारणी उपविभाग क्र.३ अ, सातारा
२३) द्वार उभारणी उपविभाग क्र.३ ड, कोल्हापूर
२४) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५) आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.

******************